**नवीन १० विषयांचे परिभाषा कोश निमिर्ती करण्यासाठी भाषा संचालनालयाअंतर्गत विषयानुरुप उपसमित्या स्थापन करणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**मराठी भाषा विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः भासस-२०१७/प्र.क्र.१८/भाषा-१**
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
तारीख : २० जून, २०१७.

**वाचा :-**

१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मवैश-१०६४-म, दि.११/१०/१९६८
२) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.मवैश-१०६४-म, दि.२१/०४/१९६९
३) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.एलएनजी-१०९३/प्र.४९/९३/२०-ब,दि.४/०४/१९९७
४) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.भासस-२०१०/प्र.क्र.७४/२०-ब, दि.२२/०६/२०१०
५) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०११/प्र.क्र.१/भाषा-२, दि.१५/६/२०११.
६) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१२/प्र.क्र.८१/भाषा-४, दि.१६/०७/२०१३.
७) शासन शुध्दीपत्रक, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१२/प्र.क्र.८१/भाषा-४, दि.३०/०८/२०१३.
८) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१३/प्र.क्र.३८/भाषा-४, दि.११/१०/२०१३.
९) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१४/प्र.क्र.५४/भाषा-४, दि.१९/३/२०१५.
१०) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१४/प्र.क्र.५३/भाषा-४, दि.२०/५/२०१५.
११) शासन निर्णय, मराठी भाषा विभाग, क्र.भासस-२०१५/प्र.क्र.३०/भाषा-१, दि.५/८/२०१५.
१२) भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, भाषा संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.भाशाता-२०१७/कोउप्र/४२२/५-६, दि.७/३/२०१७.

**प्रस्तावना :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विद्यापीठीय स्तरावर एकरुप मराठी वैज्ञानिक शब्दावली तयार करण्याचे काम भाषा सल्लागार मंडळाकडे सोपविण्यास शासनाने मंजुरी दिली होती. या कामासाठी भाषा सल्लागार मंडळाला सहकार्य करण्याकरिता प्रत्येक वैज्ञानिक व तांत्रिक विषयाकरिता त्याच्या सर्व शाखा व उपशाखांकरिता एक-एक उपसमिती नेमण्यासही शासनाने मंजुरी दिली होती. या उपसमित्यांवर सदरहू शासन निर्णयामध्ये नमूद विद्यापीठांचा / संस्थांचा प्रत्येकी एका प्रतिनिधीचा समावेश करण्यास मान्यता घेण्यात आली होती.

२. सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.२ च्या शासन निर्णयान्वये उपसमित्यांवरील विद्यापीठांच्या/संस्थांच्या/मंडळांच्या प्रतिनिधींच्या नेमणुकीचे प्राधिकार भाषा संचालकांना दिले आहेत. भाषा सल्लागार मंडळ १९८० पर्यंत कार्यरत होते. सदरहू मंडळाची पुनर्रचना करण्याऐवजी भाषा सल्लागार समिती

स्थापन करण्याचा निर्णय संदर्भ क्र. ३ च्या शासन निर्णयान्वये घेण्यात आला. त्यानंतर संदर्भ क्र. ४ च्या शासन निर्णयान्वये कायमस्वरुपी भाषा सल्लागार समिती गठीत करण्यात आली व संदर्भ क्र. ८ व ११ च्या शासन निर्णयान्वये या समितीची पुनर्रचना करण्यात आली आहे. भाषा सल्लागार समिती अंतर्गत स्थायी समितीच्या दि.१२/१०/२०१२ रोजी झालेल्या बैठकीत भाषा संचालनालयाने यापूर्वी प्रकाशित केलेल्या कोशांपैकी ५ परिभाषा कोशांच्या सुधारित आवृत्या काढणे व १० नवीन परिभाषा कोश तयार करण्याचा ठराव करण्यात आला होता. या ठरावाच्या अनुषंगाने ५ जुने परिभाषा कोश सुधारित करण्यास व १० नवीन परिभाषा कोश निर्मिती करण्याकरिता संदर्भ क्र.६ व ७ अन्वये मान्यता देण्यात आली आहे. भाषा सल्लागार समितीच्या दि.२१ व २२ जुलै, २०१४ रोजी झालेल्या बैठकीत सुधारित करावयाच्या जुन्या ५ परिभाषा कोशांपैकी "शासन व्यवहार कोश" अद्यावत करण्यासाठी "शासन व्यवहार कोश सुधारणा उपसमिती" स्थापन करण्याचा ठराव करण्यात आला. त्यास संदर्भ क्र. ९ येथील शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात आली. उर्वरीत ४ परिभाषा कोश सुधारित करण्यासाठी प्रत्येक विषयासाठी स्वतंत्र उपसमिती नेमण्यास संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये मंजूरी देण्यात आली आहे. भाषा संचालनालयाने संदर्भ क्र. १२ येथील दि. ७/३/२०१७ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार उर्वरीत नवीन १० परिभाषा कोश निर्मिती करण्यासाठी भाषा संचालनालयांतर्गत उप समित्या नेमण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

## शासन निर्णय :-

भाषा संचालनालयाने दि.७/३/२०१७ च्या पत्रान्वये विनंती केल्यानुसार नवीन १० परिभाषा कोश निर्मिती करण्यासाठी भाषा संचालनालयाअंतर्गत खालीलप्रमाणे उपसमित्या नेमण्यास शासन मंजुरी देत आहे.

१) कृषि अभियांत्रिकी परिभाषा कोश उपसमिती

२) सूक्ष्मजीवशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

३) संगणकशास्त्र व माहिती तंत्रज्ञान परिभाषा कोश उपसमिती

४) जल व भूमी व्यवस्थापनशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

५) सागर विज्ञानशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

९) योगशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

७) आहारशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

८) जैवतंत्रज्ञानशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

९) जनसंवाद परिभाषा कोश उपसमिती

१०) आपत्ती व्यवस्थापनशास्त्र परिभाषा कोश उपसमिती

२. वरील विषयांकरिता नेमलेल्या उपसमित्यांवर विद्यापीठांच्या/संस्थांच्या/मंडळांच्या प्रतिनिधींच्या नेमणुकीचे प्राधिकार भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य, भाषा संचालनालय, मुंबई यांना देण्यात येत आहेत.

३. या उपसमित्यांच्या बैठका सदस्यांच्या सोयीनुसार महाराष्ट्रात कोठेही घेण्यात येतील.

४. या उपसमित्यांवरील विद्यापीठांच्या संबंधीत प्रतिनिधींचा प्रवास भत्ता, दैनिक भत्ता इ. करिता होणारा खर्च संबंधित विद्यापीठांनी सोसावयाचा आहे.

५. मराठी विज्ञान परिषद, मुंबई व अन्य संस्थांमधील नियुक्त प्रतिनिधींना प्रवास भत्ता, दैनिक भत्ता व बैठक भत्ता भाषा सल्लागार समितीच्या अशासकीय सदस्यांप्रमाणे देण्यात येईल व त्याकरिता होणारा खर्च भाषा संचालनालयाच्या "मागणी क्रमांक झेडएफ-०१, २०५२, सेक्रेटरिएट-सर्वसाधारण **सेवा, ०९०, सेक्रेटरिएट, (००) (०२) भाषा संचालक, संगणक सांकेतांक क्रमांक २०५२ ५०६३ या लेखाशिर्षाखालील** प्रवासासाठी होणारा खर्च "**११ देशांतर्गत प्रवास खर्च**" या उद्दिष्टाखाली आणि इतर खर्च "**१३ कार्यालयीन खर्च**" या उद्दिष्टाखाली त्या त्या आर्थिक वर्षामध्ये मंजूर असलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

६. वरील समित्यांची मुदत या शासन निर्णयाच्या दिनांकापासून पुढील एक वर्ष इतकी राहील व आवश्यकता भासल्यास पुढील मुदतवाढ देण्याचे प्राधिकार भाषा संचालक, महाराष्ट्र राज्य यांना राहतील.

७. सदर शासन निर्णय उच्च व तंत्र शिक्षण विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्रमांक २३४७ दि.५/६/२०१७ अन्वये दिलेल्या मान्यतेस अनुसरून काढण्यात येत आहे.

८. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०६१९१६२१२०१४३३ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Shobha S Nipse

Digitally signed by Shobha S Nipse
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Desk Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Shobha S Nipse
Date: 2017.06.20 14:23:36 +05'30'

**(शोभा सु. निपसे)**

अवर सचिव, महाराष्ट्र शासन

प्रत,

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव,
२. सर्व मा.मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहायक,
३. प्रबंधक, मूळ शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
४. प्रबंधक, अपील शाखा, उच्च न्यायालय, मुंबई (पत्राने),
५. लोकायुक्त व उप लोकायुक्त यांचे कार्यालय, नवीन प्रशासन भवन, मंत्रालय, मुंबई,
६. प्रधान सचिव, मराठी भाषा विभाग यांचे स्वीय सहायक,
७. सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (पत्राने),

८. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२,नागपूर,
९. महालेखापाल (लेखा परीक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई/महाराष्ट्र-२, नागपूर,
१०. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
११. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
१२. वित्त विभाग (व्यय-४,सेवा-५,सेवा-६ व विनियम), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१३. उच्च व तंत्र शिक्षण विभाग,(विशि-१), मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
१४. मराठी भाषा विभागातील सर्व कार्यासने,
१५. संचालक, भाषा संचालनालय, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
१६. सहायक भाषा संचालक, भाषा संचालनालय, नवी मुंबई/पुणे/औरंगाबाद/नागपूर,
१७. संचालक, राज्य मराठी विकास संस्था, मुंबई,
१८. संचालक, दर्शनिका विभाग, मुंबई,
१९. सचिव, महाराष्ट्र राज्य साहित्य आणि संस्कृती मंडळ, मुंबई,
२०. सचिव, महाराष्ट्र राज्य विश्वकोश निर्मिती मंडळ, मुंबई,
२१. सर्व मंत्रालयीन विभाग,
सर्व मंत्रालयीन विभागांना विनंती करण्यात येते की, सदर आदेश त्यांनी आपापल्या अधिपत्याखालील विभाग प्रमुख तसेच कार्यालय प्रमुखांच्या निदर्शनास आणावेत.
२२. निवड नस्ती.